**सामान्य राज्य सेवा गट-ब संवर्गात सरळसेवेने नियुक्त झालेल्या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पकास-२४२४/प्र.क्र.३९/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक : ०६ मार्च, २०२४.

<u>वाचा :-</u>
१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन निर्णय,क्रमांक :एएसटी १११२/प्र.क्र.४७२/प्रशा-२ दिनांक ०४.०३.२०१३.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन निर्णय,क्रमांक :विभाप ३३१८/प्र.क्र.४३/प्रशा-२ दिनांक ३१.०५.२०१८.
३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन निर्णय,क्रमांक :विभाप ३३१८/प्र.क्र.४३/प्रशा-२ दिनांक १९.०९.२०१९.
४. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन निर्णय,क्रमांक :विभाप ३३१८/प्र.क्र.४३/प्रशा-२ दिनांक ०४.०९.२०२३.
५. आयुक्त शिक्षण यांचे पत्र क्रमांक :शिआका/आस्था अ/१०६/परि.काला./सारासे/गट ब/२१८६९/२०२३/७३७१, दि.३०/११/२०२३.

**<u>प्रस्तावना:-</u>**

उपरोक्त वाचा येथे नमूद अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये सरळसेवेने महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांची सामान्य राज्य सेवा गट-ब संवर्गात अधीक्षक व तत्सम या पदावर नियुक्ती देऊन पायाभूत प्रशिक्षण देण्याचा निर्णय घेण्यात आला होता. त्यानुसार सदर अधिकाऱ्यांची अधीक्षक व तत्सम पदावर २ वर्षाच्या परिवीक्षाधीन कालावधीसाठी नियुक्ती करण्यात आली होती.

२. श्रीमती सुनिता धनराज मोटघरे (नवखरे) यांची संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णया अन्वये सामान्य राज्य सेवा गट-ब या संवर्गातील अधीक्षक व तत्सम पदावर नियुक्ती देण्यात आली आहे. श्रीमती सुनिता धनराज मोटघरे (नवखरे) ह्या त्यांच्या रुजू दिनांकापासून विभागीय परीक्षेच्या उपलब्ध झालेल्या योग्य संधीत उत्तीर्ण न झाल्याने त्यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करणे शक्य झाले नाही. विभागीय परीक्षेच्या अधिक संधी उपलब्ध होण्याच्या दृष्टीने त्यांच्या परिविक्षाधीन कालावधीमध्ये संदर्भ क्र.२ ते ४ येथील शासन निर्णयान्वये एका वर्षाने वाढ करण्यात आली होती. महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे यांचेमार्फत दि.३० सप्टेंबर व ०१ ऑक्टोबर, २०२३ रोजी विभागीय परिक्षा घेण्यात आली व त्याचा निकाल दिनांक १९.१०.२०२३ अन्वये जाहिर करण्यात आला. सदर विभागीय परीक्षेमध्ये श्रीमती सुनिता धनराज मोटघरे (नवखरे) ह्या उत्तीर्ण झाल्या आहेत. सामान्य प्रशासन विभागाच्या दि. २२.६.२०२१ च्या परिवीक्षा धोरणानुसार श्रीमती मोटघरे (नवखरे) यांचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याचा शासनाच्या विचाराधीन होता. त्याअनुषंगाने शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सामान्य राज्य सेवा गट-ब मधील अधीक्षक व तत्सम या पदावर नियुक्ती करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त (शिक्षण) यांनी दिनांक १० जानेवारी, २०२४ च्या पत्रान्वये सादर केला आहे. पायाभूत शिक्षण यशस्वीरित्या पूर्ण करणाऱ्या व शासनाच्या प्रचलित धोरणानुसार परिविक्षाधीन कालावधीच्या अटींची पूर्तता करणाऱ्या खालील अधिकाऱ्यांचा त्यांच्या नावासमोर रकाना क्रमांक ७ मध्ये नमूद दिनांकास परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्यात येत असून, रकाना क्रमांक ८ मध्ये नमूद दिनांकास त्यांची सेवा पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | शासन सेवेत नियुक्ती केलेल्या आदेशाचा दिनांक | शासन सेवेत रुजू झाल्याचा दिनांक | रकाना-४ मधील दिनांकानुसार परिविक्षा कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षा कालावधीत घेतलेली अर्जित / परिवर्तित रजा व कालावधी | रकाना-६ मधील कारणामुळे वाढलेला परिविक्षा कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षा कालावधीत समाधानकार करित्या पूर्ण केल्यामुळे शासन सेवा ज्या दिनांकापासून पुढे चालू ठेवावयाची आहे तो दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) |
| १ | श्रीमती सुनिता धनराज मोटघरे (नवखरे) | ०४.०३.२०१३ | ०१.४.२०१३ | दि.३० सप्टेंबर व ०१ ऑक्टोबर, २०२३ रोजीच्या परिक्षेत उत्तीर्ण झाल्या आहेत | १९६ दिवस रजा | ०२.०५.२०२४ | ०३.०५.२०२४ |

२. श्रीमती सुनिता धनराज मोटघरे (नवखरे) यांच्या शिस्तभंग विषयक किंवा फौजदारी किंवा विभागीय चौकशी किंवा न्यायालयीन कारवाईवर परिवीक्षाधीन कालावधी संपविण्याच्या आदेशाचा परिणाम होणार नाही.

३. श्रीमती सुनिता धनराज मोटघरे (नवखरे) यांनी परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला असल्याबाबतची नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी तसेच त्यांना वार्षिक वेतनवाढी देण्यात याव्यात.

४. परिवीक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण करण्याबाबत प्रशासकीय विभागाच्या सचिवांना सक्षम प्राधिकारी म्हणून दि.२२/०६/२०२१ रोजीच्या घोषित करण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०६१४३७०६३०२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VIJAY NIVRUTTI BHOSALE

Digitally signed by VIJAY NIVRUTTI BHOSALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION ND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=c7a4e31cd0e0c9eec89f89869f2dd675d71f0636b0a2ea82e485826669926889, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7966FB8DA6E03C3F79409670C65FAC077378A68F734A11D051D02DC3119DC128, cn=VIJAY NIVRUTTI BHOSALE
Date: 2024.03.06 14:46:39 +05'30'

**( विजय भोसले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (शिक्षण), शिक्षण आयुक्त यांचे कार्यालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
२. सर्व संचालक

३. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
४. संबंधित जिल्ह्यांचे शिक्षणाधिकारी
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. संबंधित अधिकारी (आयुक्त शिक्षण यांच्या कार्यालयामार्फत)
८. निवडनस्ती.